**महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या राज्य शासनाद्वारे नामनिर्देशित संचालक मंडळाची पुनर्रचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग.**

**शासन निर्णय क्र.:-केंपुयो/वखार२०१८/प्र.क्र.१४६/१-स.**

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २६.९.२०१८

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची स्थापना Warehousing corporation Act,१९६२ या केंद्रीय कायद्यानुसार झालेली आहे. या कायद्यातील नियम २०(१) मधील तरतुदी नुसार एकूण ११ संचालक आहेत.संचालक मंडळाची रचना ही सर्व राज्याच्या वखार महामंडळासाठी समान आहे. त्यानुसार ५ संचालकांचे नामनिदेश हे केंद्रीय वखार महामंडळाव्दारे करण्यात येते व ५ संचालकांचे नामनिर्देशन राज्य शासनाद्वारे केले जाते. तसेच, राज्य शासनातर्फे १ व्यवस्थापकीय संचालक यांची नियुक्ती करण्यात येते. राज्य शासनाद्वारे नामनिर्देशित करावयाच्या महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या संचालक मंडळाची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

Warehousing Corporation Act, १९६२ मधील नियम २०(१) मधील तरतुदीनुसार राज्य शासनाद्वारे महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या ५ संचालकांची नामनिर्देशनाद्वारे नियुक्ती करावयाची आहे. त्यानुसार या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या संचालक मंडळाची खालीलप्रमाणे नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | राज्य शासनाद्वारे नामनिर्देशित करण्यात येत असलेल्या महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाचे, संचालक मंडळ. |
|---|---|
| १. | आयुक्त ( कृषि), कृषि आयुक्तालय,पुणे. |
| २. | आयुक्त(सहकार),सहकार आयुक्तालय,पुणे. |
| ३. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य,सहकारी पणन महासंघ,मुंबई. |
| ४. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य,सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या,मुंबई. |
| ५. | वित्त विभागाचे प्रतिनिधि. (उप सचिव दर्जापेक्षा कमी नाही.) |

२. सदर शासन निर्णय दि.२.८.२०१८ रोजी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पणन विभागाच्या पुनर्रचनेबाबत झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार तसेच मा.मंत्री (पणन) यांच्या मान्यतेनुसार व Warehousing Corporation Act, १९६२ मधील नियम २० (१) मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७११५९५८२२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaiprakash Mansaramji Ambade

Digitally signed by Jaiprakash Mansaramji Ambade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperative Marketing, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ce079d77649e3080d74540a4a9ae7f6502ac7e62738 91f24ffda6ebea493dce, serialNumber=d214bfebdf948d521ecc91e9cb1487d0cce5080 98bc2232154c36daba7635819, cn=Jaiprakash Mansaramji Ambade
Date: 2018.09.27 12:04:32 +05'30'

**( ज.म.अंबादे )**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई-३२,
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. आयुक्त, कृषि आयुक्तालय, पुणे,.
५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ,पुणे.
६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी पणन महासंघ, मुंबई,
७.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या,मुंबई,
८.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९. निवड नस्ती,